**नवनिर्मित वाशी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता......**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई-२००७/प्र.क्र.१९८/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ३ जून, २००९.

**संदर्भ** : - १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. पंसई-१५०६/प्र.क्र.११/पंरा-७,दि.४ एप्रिल,२००६
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,उस्मानाबाद यांचे पत्र क्र.जिपउ/बांवि/प्रशा-/३१८८/०७, दिनांक १९.१०.२००७ व दिनांक १७.४.२००८

**प्रस्तावना :-**

नवनिर्मित वाशी पंचायत समितीच्या प्रशासकीय कार्यालयाचे बांधकाम तहसिल कार्यालाच्या वर (पहिल्या मजल्यावर) बांधण्याकरीता सन २००४-०५ दर सूचीवर आधारीत असलेल्या रु.५६.०६ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय दिनांक ४ एप्रिल,२००६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. परंतु सदर काम पंचायत समितीने करावे, की सार्वजनिक बांधकाम विभागाने करावे, या मध्ये काही कालावधी गेला लागला. त्यामुळे सदर कामास सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारीत रु.६२.७६ किंमतीस तांत्रिक मंजूरी प्राप्त झाली. कामाच्या बाबींमध्ये तसेच इतर बाबींमध्ये वाढ झाल्याने सदर पंचायत समितीच्या प्रशासकीय कार्यालयाच्या रु.८२.६७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद यांनी संदर्भीय पत्रान्वये विनंती केली आहे. सदरहू कामाचे अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, उपविभाग-२ वाशी व कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, उस्मानाबाद यांनी साक्षांकित केलेले आहेत.

२. प्रस्तुत कामाची मूळ प्रशासकीय सन २००४ मधील असून, या पाच वर्षाच्या कालवधीत दरसूचीत मोठ्या प्रमाणात वाढ झालेली असल्याने मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., उस्मानाबाद यांनी संदर्भीय दि. १७.४.२००८ च्या पत्रान्वये सादर केलेला वाशी पंचायत समितीच्या प्रशासकीय कार्यालयाच्या बांधकामाच्या रु.८२.६७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय** :-

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पंसई-१५०६/प्र.क्र.११/पंरा-७, दिनांक ४ एप्रिल, २००६ अन्वये नवनिर्मित वाशी पंचायत समितीच्या प्रशासकीय कार्यालयाच्या बांधकामासाठी देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमधील किंमतीमध्ये रु.२६,६१,९३४/- रक्कमेची वाढ करुन, एकूण रु.८२,६७,४३७/- (अक्षरी रुपये ब्याऐंशी लक्ष सदुसष्ट हजार चारशे सदोतीस फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदरील अंदाजपत्रकीय कामाचा बाब निहाय सर्वसाधारण गोषवारा खालील प्रमाणे आहे :-

| क्र. | बाबनिहाय कामाचा तपशिल | मूळ प्रशासकीय मान्यता | सुधारीत प्रशासकीय मान्यता |
|---|---|---|---|
| १ | मूळ बांधकामाची किंमत | रु. ४०५२४५५.०० | रु. ६०३४६५८.०० |
| २ | आकस्मिक वाढ ४% | रु. १६२०९८.०० | रु. ४२१३४२.०० |
| ३ | पाणी पुरवठा व मल:निस्सारण १०% | रु. ४२१५००.०० | रु. ६०३४६६.०० |
| ४ | विद्युतीकरण ११ % | रु. ४६३६५०.०० | रु. ६६३८१२.०० |
| ५ | संगणीकरण २ % | रु. ८४३००.०० | रु. १२०६९३.०० |
| ६ | भाववाढ १० % | रु. ४२१५००.०० | रु. ६०३४६६.०० |
| | **एकूण** | **रु. ५६०५५०३.००** | **रु. ८२६७४३७.००** |

३ नवनिर्मित वाशी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी सन २००७-०८ अखेर रु.५६.०६ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून, सदर इमारतीचे बांधकाम सुरु आहे. उर्वरित निधी अनुदानाच्या स्वरुपात उपलब्धतेनुसार वितरीत केली जाईल.

४. यावरील खर्च "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकरण्यात यावा. यासाठीचा निधी उपलब्धतेनुसार, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B D S) अन्वये संगणकाद्वारे वितरीत करण्यांत येईल.

५. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.६७/०९/व्यय-१५, दिनांक-६.४.२००९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. **२००९०६२३०९५३३४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद उस्मानाबाद.
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद उस्मानाबाद.
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद उस्मानाबाद.
६) कोषागार अधिकारी, जिल्हा उस्मानाबाद.
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा उस्मानाबाद.
१०) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत ३).
१३) का.क्र. वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) निवड नस्ती कार्यासन क्र.पं.रा.७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.